**कोषागारात रोख देय अनुदान**

अर्थसंकल्पिय अनुदाने सन-२००९-२०१०
जर्मन अर्थसहाय्यीत आपलं पाणी प्रकल्पांतर्गत जिल्हास्तरावर स्थापन केलेल्या पाणी व्यवस्थापन कक्षातील अधिकारी / कर्मचारी यांचे वेतन, प्रवासखर्च व कार्यालयीन खर्च यासाठी अनुदानाचे वितरण. (मागणि क्र. वाय-२)

# महाराष्ट्र शासन

पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,
शासन निर्णय क्र. अनुदान-०४ ०९/प्र. क्र.६२/पापु-११
मंत्रालय, मुंबई-४०००३२. दिनांक: १ डिसेंबर, २००९

**वाचा :**

१. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग शासन निर्णय क्र. केएफडब्ल्यू ०३०९/प्र.क्र .४९/पापु.११ दि.१.३.२००९
२. वित्त विभागाकडील पत्र क्र.अंदाज-१०.०९/प्र.क्र.९०/२००९/अर्थसंकल्प-३ दि.२३.३.२००९
३. वित्तविभाग परिपत्रक क्र.अंदाज-१० ०९/प्र.क्र.१५१/२००९/अर्थसंकल्प-३. दि..३०.६.२००९
४. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग शासन निर्णय क्र. अनुदान-०४ ०९/प्र. क्र.६२/पापु-११ दि.२३.४.२००९
५. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग शासन निर्णय क्र. अनुदान-०४ ०९/प्र. क्र.६२/पापु-११ दि.१८.९.२००९

**प्रस्तावना :**

जर्मन अर्थसहाय्यीत ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छता प्रकल्प महाराष्ट्र म्हणजेच **आपलं पाणी प्रकल्प** राज्यातील पुणे, अहमदनगर व औरंगाबाद या तीन जिल्हयांमध्ये राबविण्यात येत असून, प्रकल्पाचे संनियंत्रणासाठी राज्य स्तरावर ९ पदांचा प्रकल्प संनियंत्रण कक्ष कार्यरत आहे. तसेच जिल्हास्तरावरुन प्रकल्प संनियंत्रणासाठी जिल्हापरिषदांतर्गत पाणी व्यवस्थापन कक्ष स्थापन करण्यात आले आहेत. प्रत्येक पाणी व्यवस्थापन कक्षांत २२ पदे निर्माण करण्यात आली आहेत. या सर्व पदांना संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये दि.३१.१२.२००९ पर्यंत चालू ठेवण्यास मुदत वाढ देण्यात आली आहे.

२. सन २००९-२०१० या आर्थिक वर्षाचे "महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २००९" अधिनियम क्र.१२ म्हणून महाराष्ट्र राजपत्र असाधारण भाग चार दि. २०.६.२००९ मधे प्रसिध्द करण्यात आले आहे. असे संदर्भ क्र.३ अन्वये कळविण्यात आले आहे. राज्य स्तरावरील प्रकल्प व्यवस्थापन कक्षातील अधिकारी व कर्मचारी तसेच पुणे, अहमदनगर व औरंगाबाद जिल्ह्यातील पाणी व्यवस्थापन कक्षातील अधिकारी व कर्मचारी यांचा सन २००९-१० या आर्थिक वर्षातील वेतन-भत्ते, प्रवास खर्च, कार्यालयीन खर्च व संगणकावरील खर्च इत्यादी खर्च भागवीण्यासाठी अनुदान मंजूर करणे बाबत पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :**

जर्मन अर्थसहाय्यीत पाणी पुरवठा व स्वच्छता प्रकल्पांतर्गत राज्यस्तरावरील **आपलं पाणी,** प्रकल्प व्यवस्थापन कक्ष आणि जिल्हास्तरावरील पाणी व्यवस्थापन कक्षातील अधिकारी व कर्मचारी यांचा सन २००९-२०१० या आर्थिकवर्षातील वेतन, प्रवासखर्च, कार्यालयीन खर्च, संगणकावरील खर्च इत्यादी खर्च भागविण्यासाठी अर्थसंकल्पात २२१५-पाणी पुरवठा व स्वच्छता या मुख्य लेखाशिर्षांतर्गत (०५) (०९) जिल्हा पाणी व्यवस्थापन कक्ष, (२२१५ १९६१), ३१-सहाय्यक अनुदाने" या गौण शिर्षाखाली रु.५८.०० लक्ष अनुदान मंजूर आहे. तसेच खर्चाचे पूरक विवरण पत्र (पुरवणी **मागणी विधेयक**) सन२००९-१० हे जून २००९ च्या अधिवेशनात मंजूर झाले आहे. त्यानुसार वर नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली रु.१६३.६० लक्ष तरतूद पुरवणी मागणीने मंजूर करण्यात आली आहे. म्हणजेच सन २००९-१० या वर्षासाठी या लेखाशिर्षाखाली एकूण रु.२२१.६० लक्ष अनुदान मंजूर आहे. हे अनुदान वेतन, कार्यालयीन खर्च व इतर भत्ते यासाठी आहे. तपशिलवार शिर्षानिहाय मंजूर अनुदान पुढील प्रमाणे आहे.

**(०५) (०९) जिल्हा पाणी व्यवस्थापन कक्ष, (२२१५ १९६१), या गौण शिर्षा खाली सन २००९-१० साठी तपशीलवार शिर्षानिहाय मंजूर अनुदान**

(रक्कम रु. लाखात)

| तपशीलवार शिर्ष | दि.२४.५.२००९ च्या शासन निर्णयाने पुनर्वाटप केलले अनुदान | खर्चाच्या पूरक विवरण पत्राप्रमाणे पूरक मागणीने मंजूर तरतूद | एकूण मंजूर तरतूद सन २००९-१० |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| ०१- वेतन | १९.६४ | ५२.३६ | ७२.०० |
| ११-प्रवास खर्च | ०.२० | २.८० | ३.०० |
| १३-कार्यालयीन खर्च | ०.३३ | ०.४७ | ०.८० |
| ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) | १.२० | ७.०० | ८.२० |
| ३५ सहाय्यक अनुदाने (वेतन) | ३६.६३ | १००.९७ | १३७.६० |
| | ५८.०० | १६३.६० | २२१.६० |

सदर पुनर्वाटपातून राज्यस्तरावरील **आपलं पाणी,** प्रकल्प व्यवस्थापन कक्षाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून लेखाधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, (सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष) यांना, तसेच जिल्हास्तरावरील पुणे, अहमदनगर व औरंगाबाद, पाणी व्यवस्थापन कक्षाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून या तीन जिल्ह्यांच्या जिल्हा परिषद मुख्य कार्यकारी अधिकारी यांना सन२००९-१० या आर्थिक वर्षातील, डिसेंबर२००९ या महिन्या साठी पुढील प्रमाणे अनुदान मंजूर करण्यात येत आहे. मंजूर करावयाच्या अनुदानाचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

(रक्कम रु. लाखात)

| आहरण व संवितरण अधिकाऱ्याचे नांव | ०१ वेतन वर्ग १ व २ अधिकारी व राज्यस्तरीय प्रकल्पव्यवस्थापन कक्षातील अधिकारी व कर्मचारी | | ११ प्रवास खर्च वर्ग १ व २ अधिकारी व राज्यस्तरीय प्रकल्पव्यवस्थापन कक्षातील अधिकारी व कर्मचारी | | १३ कार्यालयीन खर्च | | ३१-सहाय्यक अनुदाने (जि.प. कर्मचारी, ठोक वेतन घेणारे विशेषज्ञ, यांच्या प्रवास खर्च व कार्यालयीन खर्चासाठी.) | | ३५-सहाय्यक अनुदाने (जि.प. कर्मचारी, ठोक वेतन घेणारे विशेषज्ञ, यांच्या वेतन, - भत्ते खर्चासाठी.) | | एकूण मंजूर अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | दि.१८.९.२००९ च्या शासन निर्णयान्वये मंजूर तरतूद | या शासन निर्णया न्वये मंजूर तरतूद | दि.१८.९.२००९ च्या शासन निर्णयान्वये मंजूर तरतूद | या शासन निर्णया न्वये मंजूर तरतूद | दि.१८.९.२००९ च्या शासन निर्णयान्वये मंजूर तरतूद | या शासन निर्णया न्वये मंजूर तरतूद | दि.१८.९.२००९ च्या शासन निर्णयान्वये मंजूर तरतूद | या शासन निर्णया न्वये मंजूर तरतूद | दि.१८.९.२००९ च्या शासन निर्णयान्वये मंजूर तरतूद | या शासन निर्णया न्वये मंजूर तरतूद | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ |
| लेखाधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (सु.स.प्र.व्य.क.) | २०.८५ | ३.५० | ० | ० | ०.८० | ० | ० | ० | ० | ० | २५.१५ |
| मु.का.अ. पुणे | ८.४२ | २.०० | ०.७५ | ०.१० | ०.०० | ० | २.४० | ०.२० | २३.८० | १०.०० | ४७.६७ |
| मु.का.अ. अहमदनगर | ९.४४ | १.४० | ०.५५ | ०.१० | ०.०० | ० | १.८८ | ०.२० | २६.२० | ७.०० | ४६.७७ |
| मु.का.अ. औरंगाबाद | ९.०६ | २.०० | १.०० | ०.१० | ०.०० | ० | २.९२ | ०.२० | २८.६३ | ८.०० | ५१.९१ |
| **एकूण** | **४७.७७** | **८.९०** | **२.३०** | **०.३०** | **०.८०** | **०** | **७.२०** | **०.६०** | **७८.६३** | **२५.००** | **१७१.५०** |

२. वरील उद्दीष्टांवर होणारा खर्च मागणी क्र. "वाय-२, २२१५-पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१-पाणी पुरवठा, १०२-ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम -पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-परराष्ट्रीय सहाय्यामधून पाणीपुरवठा कार्यक्रम, उभयपक्षी सहाय्य कार्यक्रम जर्मन सरकारकडून_उभयपक्षी सहाय्य, (०५) (०९) जिल्हा पाणी व्यवस्थापन कक्ष, (२२१५ १९६१)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व या निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. **या शासन निर्णयातील वरील तक्त्यात रकाना क्र. ९ मधे दर्शविण्यात आलेल्या ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) व ३५ सहाय्यक अनुदाने (वेतन) या तपशीलवार शिर्षाखालील रकमा या दरमहा आवश्यक असलेल्या खर्चाइतक्याच कोषागारातून काढण्यात याव्यात. "दरमहा आवश्यक रकमेपेक्षा जादा रक्कम कोषागारातून काढून जिल्हाफंडात जमा करण्यात येऊ नये. जेणे करुन त्या त्या महिन्यात आवश्यक रकमेपेक्षा जादा रक्कम कोषागारातून आहरीत केली जाणार नाही." अशा वित्तविभागाच्या स्पष्ट सूचना आहेत. तरी या सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.**

४. हा शासन निर्णय, वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अंदाज १०.०९/प्र.क्र.१५१/२००९/अर्थसंकल्प-३ दि.३०.६.२००९ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

(सु. प्र. चानकर)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**<u>प्रति,</u>**

- महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता).
- मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हापरिषद, पुणे, अहमदनगर व औरंगाबाद.
- कार्यकारी अभियंता पाणी व्यवस्थपन कक्ष जि.प. पुणे, अहमदनगर व औरंगाबाद.
- विभागीय आयुक्त, पुणे. नाशिक व औरंगाबाद.
- मुख्यलेखा व वित्त अधिकारी जिल्हापरिषद, पुणे, अहमदनगर व औरंगाबाद.
- मुख्य लेखापरीक्षक,स्थानीक निधी लेखा, कोकणभवन,नवी मुंबई.
- उपमुख्य लेखापरीक्षक,स्थानीक निधी लेखा, पुणे,अहमदनगर व औरंगाबाद.
- जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे, अहमदनगर व औरंगाबाद.
- अधिदान व लेखा अधिकारी, फ्रि-प्रेस जर्नल मार्ग, फोर्ट मुंबई.
- अधिदान व लेखा अधिकारी, बांद्रा कुर्ला संकुल, बांद्रा (पूर्व)
- निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
- वित्त विभाग (व्यय-३/अर्थसंकल्प-१९), मंत्रालय, मुंबई.
- नियोजन विभाग (कार्यासन क्र१४७३), मंत्रालय, मुंबई.
- कक्ष अधिकारी पापु-०४, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
- अवर सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (सु.स.व प्र.व्य.क.) बेलापूर.
- रोख शाखा (सु.स.व प्र.व्य.क.) बेलापूर.
- लेखाधिकारी, पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
- प्रकल्प अधिकारी, जर्मन सरकार सहाय्यीत **आपलं पाणी** प्रकल्प.
- निवडनस्ती, कार्यासन क्र.पापु-११, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

D:\c driver data backup\kfw dpmu salary03-04.doc